महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती, संस्कृत, तेलुगु, बंगाली आणि गोर बंजारा साहित्य अकादमी या क्षेत्रिय कार्यालयातील पदांचा आढावा घेऊन सुधारित आकृतीबंध निश्चित करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक अआस्था ७३२४/प्र.क्र.११३(ई.नं.७५८९९४)/सांका-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १२ जून, २०२५

**संदर्भ :-** १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. आकृबं-२०२१/प्र.क्र.१९४/आस्थापना, दिनांक : २९ मे, २०२३.

२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. संकीर्ण-८२२३/प्र.क्र.११९/सां.का.४, दिनांक : १६ मार्च, २०२४.

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८,/१६/विसु-१, दिनांक : ११ फेब्रुवारी, २०१६.

४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. पदनि-०६१७/प्र.क्र.२०/आपुक, दिनांक : २९ जून, २०१७.

५) उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि. २९ जानेवारी, २०२५ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना: -**

महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई कार्यालयाचा आकृतीबंध संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयाद्वारे निश्चित करण्यात आला होता. तसेच संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयाद्वारे नवीन ४ अकादमींना मान्यता आणि नव्याने काही पदे निर्माण करण्यात आली आहेत. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ३ येथील दि.११.०२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील मंजूर पदांचा आढावा घेऊन सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्याबाबत निर्देश देण्यात आले आहेत. तसेच संदर्भाधीन क्र. ४ येथील दि.२९.०६.२०१७ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये वित्त विभागाने सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्यासाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. वित्त विभागाच्या सदर आदेशातील निर्देशानुसार पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती, संस्कृत, तेलुगु, बंगाली आणि गोर बंजारा साहित्य अकादमी या कार्यालयातील मंजूर पदांचा सुधारित आकृतीबंध वित्त विभागामार्फत गठीत उच्चस्तरीय समितीमार्फत मान्यतेसाठी सादर केला असता, उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.२९.०१.२०२५ रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती, संस्कृत, तेलुगु, बंगाली आणि गोर बंजारा साहित्य अकादमी या कार्यालयातील २३ नियमित पदे व १४ बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाच्या मनुष्यबळ सेवा अशा एकूण ३७ पदांच्या सुधारित आकृतीबंधास मान्यता देण्यात आली. त्यानुषंगाने सदर

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती, संस्कृत, तेलुगु, बंगाली आणि गोर बंजारा साहित्य अकादमी या कार्यालयाच्या आस्थापनेवरील सुधारित आकृतिबंधाचा शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती, संस्कृत, तेलुगु, बंगाली आणि गोर बंजारा साहित्य अकादमी या कार्यालयाच्या आस्थापनेवर खालील नवीन पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**विवरणपत्र- अ**

| अ.क्र. | पदनाम | वेतन स्तर | नवनिर्मित पदे |
|---|---|---|---|
| १. | संचालक(साहित्य अकादमी ) | एस-२५ रु.७८८००-२०९२०० | १ |
| २. | सहायक लेखाधिकारी | एस-१५ रु. ४१८००-१३२३०० | १ |
| ३. | अधिक्षक | एस-१३ रु. ३५४००-११२४०० | ५ |
| ४. | टिपणी सहायक | एस-८ रु. २५५००-८११०० | ३ |
| ५. | लिपिक टंकलेखक | एस-६ रु. १९९००-६३२०० | ५ |
| | | **एकूण** | १५ |

या विभागाच्या दि. २९.०५.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेल्या आकृतीबंधातील पुढील पद निरसित करण्यात येत आहे.

**विवरणपत्र-ब**

| अ.क्र. | पदनाम | वेतन स्तर | निरसित केलेली पदे |
|---|---|---|---|
| १. | लघुलेखक (निम्न श्रेणी) | एस-१५ - रु. ४१८००-१३२३०० | १ |
| | | **एकूण** | १ |

उपरोक्त कार्यवाहीनंतर महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती, संस्कृत, तेलुगु, बंगाली आणि गोर बंजारा साहित्य अकादमी या कार्यालयाच्या एकूण २३ नियमित पदांच्या व बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाच्या १४ मनुष्यबळ सेवा अशा एकूण ३७ पदांच्या सुधारित आकृतिबंधास खाली नमुद केल्याप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

**विवरणपत्र-क**

| अ.क्र. | पदनाम | गट | वेतन स्तर | मंजूर पदे |
|---|---|---|---|---|
| १. | संचालक (साहित्य अकादमी) | अ | एस-२५ रु.७८८००-२०९२०० | १ |
| २. | सह संचालक (साहित्य अकादमी) | अ | एस-२० रु. ५५१००-१७७५०० | १ |
| ३. | सहायक लेखाअधिकारी | ब | एस-१५ - रु. ४१८००-१३२३०० | १ |
| ४. | अधिक्षक | क | एस-१३ - रु.३५४००-११२४०० | ५ |
| ५. | टिप्पणी सहाय्यक | क | एस-८ रु. २५५००-८११०० | ६ |
| ६. | लिपिक-टंकलेखक | क | एस-६ रु. १९९००-६३२०० | ९ |
| | | | **एकूण** | २३ |

## विवरणपत्र-ड
## बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाच्या सेवा

| अ.क्र. | सेवा | मनुष्यबळ संख्या |
|---|---|---|
| १ | वाहन चालक (गट-क) | १ |
| २ | कार्यक्रम समन्वयक (गट-क) | ७ |
| ३ | उपसंपादक-कम-प्रुफ रिडर (गट-क) | १ |
| ४ | शिपाई (गट-ड) | ५ |
| | एकूण | १४ |

## विवरणपत्र-ई
## मृत संवर्गातील पदे

| अ.क्र. | पदनाम | गट | वेतन स्तर | कार्यरत कर्मचारी |
|---|---|---|---|---|
| १. | शिपाई | ड | एस-१ -रु.१५५००-४७६०० | १ |

सदर शासन निर्णयान्वये उपरोक्त विवरण पत्र "क" व "ड" मध्ये दर्शविल्याप्रमाणे महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती, संस्कृत, तेलुगु, बंगाली आणि गोर बंजारा साहित्य अकादमी या क्षेत्रिय कार्यालयाच्या आस्थापनेवरील एकूण ३७ पदांच्या सुधारीत आकृतीबंधास मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** विवरणपत्र-ई मधील मृत संवर्गातील पदांवर कार्यरत व्यक्तीच्या पदोन्नती/सेवानिवृत्ती/ राजीनामा/मृत्यू व अन्य कोणत्याही कारणामुळे पद रिक्त झाल्यानंतर ते पद आपोआप रद्द होईल.

**०३.** सदर आकृतीबंधातील पदांचे पदनाम व वेतनस्तर यामध्ये शासन मान्यतेशिवाय कोणतेही बदल करता येणार नाहीत.

०४. बाह्ययंत्रणेद्वारे सेवा घेताना त्या विहीत कार्यपद्धतीनुसार घेण्याची दक्षता घेण्यात यावी. बाह्ययंत्रणेद्वारे नियुक्त करावयाच्या कर्मचाऱ्यांच्या पात्रतेचे किमान निकष ठरविण्यात यावेत. बाह्ययंत्रणेव्दारे सेवा घेताना, वित्त विभागाच्या दि. २७.०४.२०२२ शासन निर्णयातील सूचनांचे तसेच वेळोवेळी निर्गमित करण्यात येणाऱ्या सूचनांचे पालन करण्याची जबाबदारी संचालक/ सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती, संस्कृत, तेलुगु, बंगाली आणि गोर बंजारा साहित्य अकादमी यांची राहील.

**०५.** सदर आकृतीबंधातील संचालक (साहित्य अकादमी) (एस-२५ रु.७८८००-२०९२००) पदाच्या निर्मितीस मा. मंत्रीमंडळाच्या दि.१६ मार्च, २०२४ रोजीच्या बैठकीत मान्यता देण्यात आलेली आहे.

**०६.** नव्याने निर्माण करण्यात आलेल्या पदांचे सेवाप्रवेश नियम तात्काळ शासन मान्यतेसाठी पाठविण्यात यावे.

**०७.** महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती, संस्कृत, तेलुगु, बंगाली आणि गोर बंजारा साहित्य अकादमी या कार्यालयाच्या आस्थापनेवरील पदांकरीता होणारा खर्च मागणी क्र. झेडडी २, २२०५ - कला व संस्कृती, ००, ००१-संचालन आणि प्रशासन, ०३-साहित्य अकादमी, (०३) (०१) साहित्य अकादमीची आस्थापना (दत्तमत) (अनिवार्य), २२०५ ४१५९ या मुख्य लेखाशीर्षांतर्गत ०१ - वेतन या उपशीर्षांतर्गत त्या-त्या वर्षी मंजूर अनुदानातुन नियमित कर्मचाऱ्याचे वेतन आणि १०-कंत्राटी सेवा या उपशीर्षांतर्गत त्या-त्या वर्षी मंजूर अनुदानातुन बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाच्या सेवांचा खर्च भागविण्यात यावा.

०८. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २६१/आपुक, दि.०५.०६.२०२५ नुसार मिळालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

०९. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याच सांकेतांक २०२५०६१२१२०७२०८१२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

MAHESH KISAN WAVHAL

Digitally signed by MAHESH KISAN WAVHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=a5f6330d58102c34226358d9eb88eeaac75f0fd9db44b648fc5f6dc90d3ca6a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=495C75B4C173C81F308BD63A1B33A5DA4EA131ED182D44EA1B502AB4662E9810, cn=MAHESH KISAN WAVHAL
Date: 2025.06.12 12:08:31 +05'30'

**( महेश किसन वाव्हळ )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (सेवा) यांचे स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (व्यय) यांचे स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (ले.व को.) यांचे स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (पर्यटन) यांचे स्वीय सहायक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई..
१०.महालेखापाल-१ व २ ( लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३.उप सचिव (सां.का.४/आस्थापना) यांचे स्वीय सहायक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४.अवर सचिव/ कार्यासन अधिकारी (सां.का.४/अर्थसंकल्प/आस्थापना), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५.वित्त विभाग, आपुक/व्यय-१५/अर्थसं-११, वित्तीय सुधारणा मंत्रालय, मुंबई.

१६.संचालक/सह संचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती, संस्कृत, तेलुगु, बंगाली आणि गोर बंजारा साहित्य अकादमी मुंबई.

१७.निवड नस्ती सां.का.-४.